आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मुख्यमंत्री सौर कृषि पंप योजना - अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(लेखाशिर्ष २८१० ०९७४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.०९/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - २१ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.९/कार्या-६, दि.०९.०८.२०२४ व दि.१५.०१.२०२५.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र.पूरक-२०२४/प्र.क्र. १३२/ऊर्जा-७.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ऊर्जा विभागाकडून अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या मुख्यमंत्री सौर कृषी पंप या योजनेंतर्गत सौर कृषि पंपांसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.४ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २८१०, नवीन व नवीकरणीय ऊर्जा मधील मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजनेसाठी सन २०२४-२५ च्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.कोटीत)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ साठी मंजूर सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मुख्यमंत्री सौर कृषी पंप | २८१० ०९७४ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २८९.९८५३ | २२.८० | १८०.१८९७१ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१८०.१८९७१ कोटी (अक्षरी रुपये एकशे ऐंशी कोटी अठरा लाख सत्याण्णव हजार शंभर फक्त) इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, ऊर्जा विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय संदर्भाधीन क्र.१ व २ मधील वित्त विभागाच्या मधील शासन परिपत्रकांन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ई-ऑफिस नस्ती क्र.८७८५३२, दि.०६.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२११३०८१४५२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2025.03.21 13:17:59 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.